**बृहन्मुंबईतील कार्यालयात कार्यरत असलेल्या शासकीय अधिकारी/कर्मचा-याची बृहन्मुंबईबाहेर बदली झाल्यास त्याबाबतच्या आदेशाची प्रत सामान्य प्रशासन विभागातील कार्यासन-२३अ ला तसेच अधिक्षक अभियंता,मुंबई (सा.बां.) मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग,मुंबई यांना पृष्ठांकित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः- शानिवा-२५१७/प्र.क्र.३४४/१७/२३-अ**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२
तारीख:- ०१ सप्टेंबर, २०१७

**परिपत्रक:-**

सामान्य प्रशासन विभागाच्या अखत्यारीतील बृहन्मुंबईतील शासकीय सेवा निवासस्थाने बृहन्मुंबईतील कार्यालयात कार्यरत अधिकारी/कर्मचा-यांना वाटप करणे व त्याअनुषंगिक कार्यवाही या विभागामार्फत केली जाते.

२. बृहन्मुंबईमध्ये शासकीय निवासस्थानांची संख्या अपुरी असल्याने अधिकारी/कर्मचारी यांच्याकडून शासकीय निवासस्थान मिळण्याबाबत प्राप्त झालेल्या अर्जांची पडताळणी करुन त्यांची प्रतिक्षायादी बनविली जाते व प्रतिक्षादीतील क्रमांकानुसार शासकीय निवासस्थानांचे अधिकारी/ कर्मचा-यांना वाटप करण्यात येते.

३. सदरची कार्यवाही करताना असे निदर्शनास आले आहे की, बृहन्मुंबईतील कार्यालयात कार्यरत अधिकारी/कर्मचा-यांची बृहन्मुंबई बाहेर बदली होऊनही ते शासकीय निवासस्थाने रिक्त करत नाहीत. वस्तुत: बृहन्मुंबईबाहेर बदली झाल्यावर शासकीय निवासस्थान ताब्यात ठेवण्याचा विहित कालावधी संपुष्टात आल्यावर अथवा त्यापूर्वीच शासकीय निवासस्थान रिक्त करणे आवश्यक आहे. सदर कालावधी संपुष्टात आल्यावरही निवासस्थान रिक्त न केल्यास संबधितांवर निष्कासनाची कारवाई करण्यात येते.

४. तसेच बृहन्मुंबईतील कार्यालयात कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांची बृहन्मुंबई बाहेर बदली झाल्याबाबतची माहिती उपलब्ध होत नसल्याने या अनुषंगाने आवश्यक असलेली भाडे वसुली तसेच निष्कासनाची कार्यवाही विहित वेळेत करणे शक्य होत नाही.

५. वरील वस्तुस्थिती विचारात घेता बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयात कार्यरत असलेल्या अधिकारी/कर्मचा-यांची बृहन्मुंबईबाहेर बदली झाल्यास त्याबाबतच्या आदेशाची प्रत सामान्य प्रशासन विभागातील कार्यासन-२३अ या कार्यासनाला तसेच अधिक्षक अभियंता, मुंबई (सा.बां.) मंडळ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांना पृष्ठांकित करण्याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०९०११२०९५०७८०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Rajesh Sudhakar Wadnerkar

Digitally signed by Rajesh Sudhakar Wadnerkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab64acf9acc2b1c026a9f36d01fcf0fef77d967f2bf49a3b51d07aee2982c881, cn=Rajesh Sudhakar Wadnerkar
Date: 2017.09.01 12:00:24 +05'30'

**( रा.सु.वडनेरकर )**

कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग

**प्रत,**

सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई

२. त्यांना विनंती करण्यात येते की, उपरोक्त परिपत्रकातील सूचना आपल्या विभागातील संबंधित सर्व कार्यासनांच्या तसेच बृहन्मुंबईतील आपल्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयांच्या निदर्शनास आणावी.

Rajesh Sudhakar Wadnerkar

Digitally signed by Rajesh Sudhakar Wadnerkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=GAD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab64acf9acc2b1c026a9f36d01fcf0fef77d967f2bf49a3b51d07aee2982c881, cn=Rajesh Sudhakar Wadnerkar
Date: 2017.09.01 12:02:52 +05'30'

**( रा.सु.वडनेरकर )**

कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग